महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामधील उप
अभियंता (स्थापत्य) यांच्या विनंती बदल्या

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मजीप्रा २०१६/प्र.क्र. २८८/पापु २३**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई ४०० ००१
तारीखः ३१ मे, २०१७

वाचा :

१.शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.मजीप्रा २०१४/प्र.क्र. ३३ (अ)/पापु-२३, दिनांक २३ मार्च,२०१७.

२.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, अ.शा.पत्र क्र. मजीप्रा १११७/प्र.क्र.१२५/पापु-२३, दिनांक २७.एप्रिल,२०१७

**शासन आदेश :-**

शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.इएसटी १०९७/प्र.क्र. ३७०/पापु-२३,दि. ८.२.१९९९ अन्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अभियांत्रिकी संवर्गातील विविध पदांना पाटबंधारे विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेले सेवा प्रवेश नियम जसेच्या तसे लागू करण्यात आलेले आहेत.

२. उपरोक्त वाचा क्र. १ मधील या विभागाच्या शासन निर्णय दिनांक २३.३.२०१७ अन्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिकारी/कर्मचारी यांचे यापुढील वेतन भत्ते व निवृत्ती वेतनाचे दायित्व राज्य शासनाने स्विकारले आहे.

३. उपरोक्त वाचा क्र. २ मधील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अ.शा.पत्र दिनांक २७.४.२०१७ अन्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामधील गट -अ व गट-ब (राजपत्रित) अधिकारी/ अभियंते यांच्या सर्व सेवा विषय बाबी शासन स्तरावरुन पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत हाताळण्यात येणार आहेत.

त्या अनुषंगाने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामधील कर्मचा-यांचे बदल्यांचे विनयम २०१३ नियम ४(४) (दोन) व नियम ४ ( ५ ) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामधील उप अभियंता (स्थापत्य) यांची खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे विनंती बदलीने पदस्थापना देणे आवश्यक असल्याने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पदनाम | सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. जी.ए.पाटील | उप विभागीय अधिकारी | ग्रामीण पाणी पुरवठा उपविभाग,खुल्ताबाद, जि.प., औरंगाबाद | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, सांगली. | विनंतीने बदली |
| २ | श्री. जगदिश काटकर | उप अभियंता (स्थापत्य) | ग्रामीण पाणी पुरवठा उपविभाग औरस. | ग्रामीण पाणी पुरवठा उपविभाग क्र.५, जिल्हा परिषद, कोल्हापूर | विनंतीने बदली |
| ३. | श्री. सी.जे. रघुवंशी | उप विभागीय अधिकारी | तात्पुरती पदस्थापना ग्रामीण पाणी पुरवठा जामखेड,जिल्हा परिषद, अहदमनगर | ग्रामीण पाणी पुरवठा जामखेड, जिल्हा परिषद, अहदमनगर | जि.प.जळगाव येथून एकतर्फी कार्यमुक्त केल्याने नियमित पदस्थापना देणे आवश्यक असल्याने |

४. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. वर नमूद अधिका-यांच्या बदली आदेशाची तात्काळ अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने सर्व संबंधितांनी पुढील सूचनांचे कटाक्षाने पालन करावे.

१) बदली झालेल्या अधिकाऱ्यास / कर्मचा-यास संबंधित कार्यालय प्रमुखाने तात्काळ कार्यमुक्त करुन तसे सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व शासनास कळवावे. तसेच बदली झालेल्या अधिकारी/कर्मचारी यांनी त्यांची पदस्थापना केलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे.

२) बदली झालेले अधिकारी बदलीच्या ठिकाणी संबंधित कार्यालयात रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यास विनाविलंब हजर करुन घ्यावे अन्यथा संबंधित कार्यालय प्रमुखास जबाबदार धरण्यात येईल.

३) बदली आदेशात बदली करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिका-याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणल्यास संबंधित अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहील.

४) संबंधितांच्या विनंतीनुसार करण्यात आलेल्या बदलीमुळे त्यांना त्यांच्या बदलीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी पदग्रहण अवधी तसेच कोणत्याही प्रकारचा प्रवास भत्ता अथवा अनुषंगिक भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३११०५२५७२६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2017.06.01 16:31:54 +05'30'

**(महेश सावंत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव,मंत्रालय मुंबई.
२. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे वि.का.अ. मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प., औरंगाबाद, कोल्हापूर, सांगली, अहमदनगर व सिंधूदूर्ग.
७. सर्व मुख्य अभियंता, प्रादेशिक विभाग,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
८. सर्व अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ.
९. श्री. जी.ए. पाटील, उप विभागीय अधिकारी, ग्रामीण पाणी पुरवठा उपविभाग, खुल्ताबाद, जि.प., औरंगाबाद. यांना मु.का.अ.जिल्हा परिषद औरंगाबाद यांचे मार्फत.
१०. श्री. जगदिश काटकर, उप अभियंता (स्थापत्य), ग्रामीण पाणी पुरवठा उपविभाग,जिल्हा परिषद औरस यांना मु.का.अ.जिल्हा परिषद सिंधूदूर्ग यांचे मार्फत.
११. श्री. सी.जे. रघुवंशी, उप विभागीय अधिकारी, ग्रामीण पाणी पुरवठा जामखेड, जिल्हा परिषद, अहदमनगर यांना मु.का.अ.जिल्हा परिषद अहमदनगर यांचेमार्फत.
१२. निवडनस्ती पापु-२३